**नगर-नियोजन आणि राजकारण : आवश्यक व अतूट संबंध**

*Who plans, with what ends and means, for what interest group?*
*- Hebert J Gans in People and Plans*

**वसंत पळशीकर**

शहरे माणसाला नवी नाहीत. पण सतत आणि झपाट्याने वाढणारी शहरे, आणि जवळपास जगभर एकाच वेळी सर्वच शहरे वाढत आहेत, ही घटना अलीकडची आणि नवीन आहे. सुरुवातीला काही दिवस ती लोकांना कौतुकाची वाटली. दिवसेंदिवस ती वाढत्या चिंतेची बाब बनत आहे. शहरे अशीच वाढत गेली तर?

अर्नोल्ड टॉयन्बी यांच्या 'सिटीज ऑन द मूव्ह' या ग्रंथाचा तो विषयच आहे. टॉयन्बी हे प्रख्यात इतिहासकार आहेत. प्रस्तुत ग्रंथाच्या लेखनात ती गोष्ट विषयांतराला कारणीभूत ठरली आहे. ग्रंथाच्या मुख्य विषयाला बगल देऊन, प्राचीन कालापासून ते कालपरवापर्यंतच्या शहरांविषयी मनोरंजक पण अप्रयोजक माहिती आपणास ते देत राहतात. असा सर्व मजकूर वगळल्यास २५० पृष्ठांपैकी सुमारे पन्नास एक पृष्ठांचा मजकूर तेवढा उरतो.

आणखी पन्नास-पाऊणशे वर्षांत पृथ्वीतलावर, मध्ये येणाऱ्या महासागरांनी सलगपणा जो काय खंडित होईल तो सोडून, एक सलग 'विश्वनगरी' (डॉ. डॉक्सियाडिस यांनी उपयोजिलेला 'एक्यूमेनोपोलिस' हा शब्द टॉयन्बीनी सर्वत्र वापरला आहे ) अस्तित्वात येईल. ती अस्तित्वात येणे अपरिहार्य आहे हे त्यांचे प्रमुख गृहीतकृत्य आहे. ही नगरी, या नगरीतले जीवन माणसांना तापदायक न ठरता मंगलकारक ठरण्यासाठी काय केले पाहिजे?

ग्रामीण भागातून होत असलेले स्थलांतर, लोकसंख्येची स्फोटक वेगाने झालेली वाढ या दोन कारणांमुळे शहरांच्या वाढीस वेग आला आहे. पण आकारमान हेच आजच्या शहरांचे वैशिष्ट्य नाही. रेल्वे, बस, मोटार, विमान, इ. वाहतुकीच्या साधनांमुळे नोकरीधंद्याच्या जागेपासून लांब राहून रोज जा-ये करणाऱ्यांची वाढती संख्या व त्यांनी शहरी जीवनाचा निर्माण केलेला नवा घाट हे एक अत्यंत महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. एका दिवसात जाऊन परत येता येईल इतके अंतर याने शहराची कमाल परिसीमा पूर्वी निश्चित होत आली तर वरील जलद वाहतुकीच्या साधनांमुळे आजची महानगरे आणि महानगर समूह ('कॉनर्बेशन') शक्य झाले आहेत.

या महानगरांतील जीवन चांगले नाही कशावरून? याबाबतीत टॉयन्बींनी लोकांच्या वर्तनाचाच आधार घेतला आहे, तो मोठा मार्मिक आहे. शहर आणि त्या शहराचे रहिवासी यांचे संबंध आजपर्यंत कसे होते? कालपरवापर्यंत आपल्या शहराबद्दल शहरवासीयाला प्रेम व अभिमान वाटे. ती त्याची स्वाभाविक भावना होती. ('The normal feelings of a citizen towards his city has been pride and love.') आजचा नागरिक काय करतो? विशेषतः यशवंत नागरिक काय करतो? आजच्या यांत्रिक शहरात जो कोणी पैसा करतो तो, त्याला पैसा देणाऱ्या त्या नरकपुरीपासून शक्य तितक्या दूर आणि शक्य तितक्या अधिक वेळा पळ काढतो. पुरेसा पैसा साठला की शहराच्या गर्दीच्या मुख्य केंद्रापासून दूर, निवांत, मोकळ्या जागी तो प्रथम आपला निवास हलवितो; सुटीसाठी तो, जिथे अद्यापही निसर्गशोभा

टिकून आहे अशा ठिकाणी जातो; पोटाला मिळविण्याची जागा यापलीकडे त्याला आपल्या शहराबद्दल माया, जवळीक वाटत नाही.

जिथे आपण घाम गाळतो, आपण करतो त्या कामाच्या स्वरूपात आपली खूण मागे ठेवतो, दिवसाचे अनेक तास नियमाने घालवितो त्या जागेत आपणास उपन्यासारखे वाटावे, त्या जागेबद्दल आपल्या मनात खोल घृणा, उबग निर्माण व्हावी ही गोष्ट हितकारक नाही; हा परिणाम निर्माण करणारे जीवन अभद्र होय असे टॉयन्बींना वाटते. रोज ज्या वातावरणात - आसमंतात काम करतो, राहतो ते वातावरण - आसमंत व्यक्तीला समाधान व आनंद देणारे असले पाहिजे.

असे मानसिक व शारीरिक - दोन्हीदृष्ट्या आरोग्यवर्धक व समाधानकारक आसमंत (व पर्यायाने दैनंदिन जीवन) महानगरांतून (किंवा भविष्यकालीन 'विश्वनगरी'तून) निर्माण व्हावे यासाठी काय केले पाहिजे? लोक जेथे राहतात त्या वस्त्या आकाराने छोट्या, एकात्म अशा बनवाव्यात. एकेक वस्ती म्हणजे जुन्या काळचे खेडेगावच जणू. अशा वस्त्यांचे मिळून नगर बनावे. हे नगर फार मोठे नसावे. त्याची फार वाढ होऊ नये म्हणून कोणत्याही एका उद्योग-व्यवसाय-करमणूक बाजारपेठ केंद्राची वाढ फार होऊ लागली की शेजारी दुसरे चुंबक केंद्र निर्माण करावे. अशा नगरांची गोधडी म्हणजेच ‘विश्वनगरी’ असेल. थोडक्यात टॉयन्बींची सूचना ही अशी आहे.*

** The immediate social setting of the inhabitant of Ecumenopolis must be on no larger a scale than that of the rural village - a settlement whose inhabitants are neighbours in a positive sense of being in personal relations with each other. In virtue of its performance of this social function the village-size component of the World-City will be the most important one of all; but it will be social and administrative units rising, in an ascending order only the minimum scale component in a hierarchy of social and administrative units rising, in an ascending order of magnitude, to the ecumenical scale of the World-City itself. In this hierarchy the neighbourhood unit will be a ward of one of the civic centres that will be the open-ended 'World-City's direct constituents; and, if the humanization of life at the ward level is not to be lost at the civic centre level, each civic centre must be.. on the scale of the traditional local city. (p. 245 – 246 )*

*As Dr. Doxiadis puts it, the closed city has now to be replaced by one that is open-ended. Long before pressure on a particular city centre has increased to a degree at which it would be intolerable, the increase must he halted by diverting the further quanta of the mounting pressure to another centre and then to another and another, in a continually lengthening echelon, as population and construction and production and traffic continue to increase. (p. 244)*

टॉयन्बींच्या विवेचनातील त्रुटी लक्षात घेणे आवश्यक आहे. भौगोलिकदृष्ट्या एका लहान क्षेत्रात - त्यांच्याच उदाहरणानुसार पूर्वीच्या खेडेगावाइतक्या - लोक एकत्र राहत असले की त्यांच्यामध्ये आपोआपच एकात्म जीवन निर्माण होते का? वस्तीच्या परिसीमा छोट्या व निरुंद असल्यामुळे खेडेगावातले जीवन एकात्म असे, की सामाजिक

जीवनाच्या विशिष्ट घाटामुळे? म्हणजेच, समाजजीवनाला एक विशिष्ट घाट प्राप्त होतो तो भौगोलिक जवळिकीमुळे की अन्य कारणांमुळे?

टॉयन्बींना हवी तशी (छोट्या, एकात्म वस्त्या, आणि अशा वस्त्यांची मिळून बनलेली) लहान नगरे निर्माण करावयाची म्हणजे आजचा प्रवाह उलटवायचा. पण माणसे रात्रीची झोपतात त्या वस्त्यांच्या रचनेपुरताच प्रवाह उलटवून थांबायचे ते का? आजच्या अभद्र नागरी जीवनाचा फायदा कोण उठवितो? सर्वांना चांगले जीवन जगायला मिळेल अशी रचना करावयाची झाल्यास त्याला कोणाचा विरोध होईल? पाश्चात्त्य राष्ट्रांतून, विशेषतः अमेरिकेत, आजच शहरांच्या मध्यभागांतून, सापेक्षतः, गरीब एकवटले आहेत व सधन उपनगरांतून पसरले आहेत. तेथे काय अनुभव येतो, तर या मध्यभागातील आसमंत सुधारण्यासाठी लागणारा पैसा कररूपाने देण्यास सधन राजी नाहीत. नाना पळवाटा काढून ते ही जबाबदारी टाळू इच्छितात. थोडक्यात, नागर जीवनाची पुनर्रचना हा एका बाजूला राजकीय व स्फोटक मामला आहे तर दुसऱ्या अंगाने तो चांगल्या जीवनाबद्दलच्या कल्पनांशी जाऊन भिडणारा आहे. नगरे, महानगरे यांतील 'झोपडपट्ट्यां'मधून राहणारे निर्धन व उपनगरांतून राहणारे सधन यांच्यामधली दरी रुंदावल्यास त्यातून हिंस्र संघर्ष उद्भवेल याचे भान टॉयन्बी दाखवितात. पण टाळावी अशी एक भयप्रद परिस्थिती एवढेच म्हणण्यापुरते त्यांचे भान उथळ राहते. ही परिस्थिती बदलायची असेल तर कोणती कृती आवश्यक आहे त्याच्या खोलात जाण्याची त्यांना आवश्यकता वाटत नाही. या दृष्टीने पाहिल्यास टॉयन्बी यांचे पुस्तक अत्यंत निराशाजनक आहे: आपल्या इतिहासाच्या अभ्यासाच्या आधारे या प्रश्नावर त्यांनी नवा असा कोणताच प्रकाश पाडलेला नाही, की नागरी नियोजनात गुंतलेल्या इतर प्रश्नांची जाण त्यांनी दाखविलेली नाही.

ही जाण हे आर. इ. पाह्ल यांच्या ‘हूज सिटी?’ या पुस्तकाचे वैशिष्ट्य आहे. वेळोवेळी लिहिलेल्या लेखांचा हा संग्रह आहे. यातील बरेच लेख इंग्लंडमधील परिस्थितीचे तपशील स्पष्ट करणारे आहेत. त्यांच्या खोलात येथे जाण्याचे कारण नाही. पण बारकाव्यात जाऊन परिस्थितीचा अभ्यास करू लागले की सरसकट विचार करण्यातले धोके स्पष्ट होऊ लागतात व प्रश्नाचे नेमके स्वरूप नजरेसमोर येते, जे सरसकट विधानांनी लपलेले असते. नेमकी वस्तुस्थिती लपवीत असल्याकारणाने सरसकट विचारपद्धती धोकादायक कशी असते याचे दिग्दर्शन घडविण्याच्या दृष्टीने त्यांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

नगरनियोजन करावयाचे म्हणजे असलेल्या शहराची हद्द वाढवून घ्यायची, या नव्या परिसीमांमध्ये उद्योग, बाजारपेठ, निवास, इ. विभाग पाडायचे, रस्ते रुंद करण्याच्या योजना आखावयाच्या वगैरे, अशी समजूत झालेली आहे. पण कोणतेही शहर घेऊन ते अमूकच एका पद्धतीने का वसले, त्यातली घरे, रस्ते, चौक यांची रचना विशिष्ट प्रकारची का आहे असा विचार केल्यास शहराच्या स्थलात्मक रचनेत समाजव्यवस्था व जीवन प्रतिबिंबित झाले असल्याचे आढळून येईल. समाजाची मूल्यबैठक, त्या समाजाची उद्दिष्टे, इत्यादींनी समाजव्यवस्थेला व जीवनाला विशिष्ट घाट प्राप्त होत असतो. म्हणजेच नागरी नियोजन करावयाचे तर त्यामागची मूल्यबैठक व सामाजिक उद्दिष्टे स्पष्ट हवीत. वास्तविक ही गोष्ट अगदीच प्राथमिक आहे पण ती सांगावी लागते अशी आजची परिस्थिती आहे.

एका नव्या घाटाच्या शहराविषयी पाश्चात्त्य देशांत खूप रम्य चित्रे रंगविली जात आहेत. या उद्याच्या महानगरातली माणसे निसर्गरम्य 'ग्रामीण' परिसरात राहतील. उत्तम जलद राजमार्गांवरून ते स्वतःच्या मोटारींनी महानगरात कामाला येतील व संध्याकाळी परत जातील. त्यांची निवासस्थाने, त्याभोवतीचा परिसर प्रशस्त, निवांत असेल. अशा वसाहतींमध्ये एक नवे एकात्म समूहजीवन फुलेल, बहरेल, इ. ही सर्व चित्रे कशाच्या आधारे रंगविली जातात? तर मोटारींच्या संख्येतील स्फोटक वेगाने होत आलेली वाढ, 'कामगारही मोटारने येतात' ही दृश्य परिस्थिती, आधुनिक तंत्रविद्येमुळे अंतरे तोडण्याची साधलेली किमया, या प्रकारच्या गोष्टींवरून समाजातील किती टक्के लोकांजवळ मोटारी आहेत? आपल्या कामाच्या ठिकाणापासून दूर राहून येणे जाणे करणे किती लोकांना परवडण्यासारखे आहे? बंगलेवजा जागा राहण्यासाठी घेणे कितींच्या आवाक्यात आहे? इंग्लंडच्या संदर्भात, त्यातही लंडनच्या अवतीभोवतीच्या समृद्ध भागात, हे प्रश्न उपस्थित करून त्यांची उत्तरे प्रत्यक्ष जागेवर काय येतात ते पाह्ल यांनी पाहिले. आपल्या मनावर उमटणाऱ्या ठशांवर विसंबून न राहता केलेल्या एका ठिकाणच्या सर्व्हेत त्यांना काय आढळले? कामगार कुटुंबांपैकी अर्ध्याहून जास्त कुटुंबांजवळ मोटार वा मोटार-सायकल, कोणतेच वाहन नव्हते, आणि घरातल्या कर्त्या माणसास जी जा-ये करावी लागे त्याच्याशी स्वतःच्या मालकीची मोटार वा मोटार-सायकल असण्यानसण्याचा काही संबंध नव्हता असे दिसले. आणि ही परिस्थिती कामाच्या ठिकाणापासून जरा दूर, ग्रामीण भागात राहणाऱ्या सुस्थित कामगारांच्या बाबतीत होती हे लक्षात घ्या. शहरातील गरीब श्रमजीवी वेगळेच. येथले मध्यमवर्गीय हे स्वतःचे घर विकत घेऊन, शहरापासून दूर राहण्यातला जादा खर्च करू शकतील अशा थरातील, म्हणजेच सधन असल्याने त्यांच्यापैकी बहुतेकांजवळ मोटार होती. या सधन पातळीखालचे मध्यमवर्गीय शहरातल्याच निकृष्ट वस्त्यांमध्ये अडकून पडलेले असणार. तात्पर्य, ही उद्याची स्वप्ननगरी समाजातल्या थोडक्याच लोकांसाठी असू शकते.

त्याही पलीकडे जाऊन, शहरांपासून (म्हणजेच कामाच्या ठिकाणापासून) दूर राहणारे लोक हे आवड म्हणून दूर जाऊन रहात आहेत की इतके दूर गेल्याखेरीज त्यांना राहण्यास बऱ्यापैकी जागाच मिळत नाही म्हणून? कामाच्या ठिकाणापासून जवळच बऱ्यापैकी जागा मिळती तर यापैकी बहुसंख्य जण इतक्या दूर येऊन राहणार नाहीत.

समजा आपण अशा निष्कर्षाला आलो की कामाच्या ठिकाणापासून माणसाने दूर राहिले पाहिजे, त्याला राहण्यासाठी स्वतः चे प्रशस्त घर (अंगण-बगीचा असलेले) असले पाहिजे, जा-ये करण्यासाठी एक तरी मोटार असायला हवी. समाजातल्या प्रत्येक कुटुंबाला या परिस्थितीत नेऊन ठेवणाऱ्या नगरनियोजनाची कल्पना करावी. त्यासाठी वस्तुगत व आर्थिक साधनसंपत्ती किती लागेल त्याचा अंदाज करावा. त्याची अशक्यता पटायला वेळ लागणार नाही. याचाच अर्थ असा की, विशेष विचार न करता, या उद्याच्या महानगरीचे रसभरित वर्णन करीत तिच्यासाठी नगरनियोजक आखणी करतो तेव्हा तो नकळत आजच्या विषम समाजव्यवस्थेला उचलून धरीत असतो, तिला आपली मान्यता दर्शवीत असतो.

भौगोलिकदृष्ट्या एका लहान परिसरात लोक एकत्र राहिले की त्यांचे एक एकात्म सामाजिक जीवन आकारास येते का? या प्रश्नाचे उत्तरही पाह्ल यांनी शोधले. त्यांना असे आढळून आले की व्यवसाय, उत्पन्नपातळी,

सामाजिक-सांस्कृतिक थर या दृष्टीने एकजीनसीपण आधी असले तरच सामाजिक संबंध प्रस्थापित होतात. एरवी केवळ एका परिसरात आहेत म्हणून एकात्म सामाजिक जीवन निर्माण होत नाही. याचे कारण असे की, एका परिसरात असूनही वरील कसोट्यांच्या दृष्टीने वेगवेगळे असलेल्या गटांच्या सामाजिक जीवनाचा घाट मुळातूनच वेगळा असतो व तो त्याच साच्यात कायम राहतो. साधा बाजारहाट करावयाचा झाला तरी सधन मध्यमवर्गीय व कामगारवर्गीय एकाच जवळच्या बाजारपेठेत जात नाहीत.

मोटारींचा फैलाव झाल्याने व मोटारी आणि मोटारवाले चटकन् डोळ्यात भरण्यासारखे असल्याने दृष्टिदोष निर्माण होतो व चुकीची धोरणे अंगिकारली जातात. ज्यांच्याजवळ मोटारी नाहीत वा ज्यांना वृद्धापकाळामुळे मोटारी वापरणे शक्य नाही अशांना उपलब्ध असणाऱ्या सेवांचा संकोच होत आहे. म्हणजे विषमता अधिकच तीव्र होत आहे.

पाह्ल यांना आढळून आलेली वैशिष्ट्ये आपल्याला येणाऱ्या अनुभवांशी पडताळून पाहता यणारी आहेत. तेथील परिस्थिती निराळी असल्यामुळे तेथील सर्वच वैशिष्ट्ये येथे आढळणार नाहीत. पण नगरनियोजनाच्या नावाने आज जी फिरवाफिरव केली जाते तीमधून थोडक्यांची सोय व बहुतेकांची बरीच गैरसोय असा प्रकार घडतो याचा अनुभव येतो. स्वतःच्या मालकीचे वाहन नसणाऱ्यांचे विशेष हाल होतात, त्यांना एका निकृष्ट, बंदिस्त, काचलेल्या जीवनात पुष्कळदा समाधान मानून घ्यावे लागते, असे स्थूलमानाने म्हणता येईल.

आपल्या एका निबंधात पाह्ल एक मूलभूत प्रश्न उपस्थित करतात. नगरनियोजनशास्त्रज्ञांनी व इतर अनेक 'मंगल जीवना'च्या पुरस्कर्त्यांनी, माणसे शहरातून गर्दी करून राहतात यात शहरी जीवनातल्या सर्व अनैतिक, विध्वंसक व समाजकंटक वैशिष्ट्यांचे मूळ पाहिले आहे. माणसे स्वतःला पारखी होतात, आनंदाला मुकतात, माणसामाणसांतील संबंध कोरडे, व्यवहारी होतात असे मानले आहे. शहरातून माणसांना अस्वाभाविक मर्यादेपर्यंत दाटीवाटीने रहावे लागत आहे, ही गोष्ट खरी. पण जेथे शहरी जीवनातली गर्दी नाही त्या खेड्यापाड्यांतूनही हीच सारी वैशिष्ट्ये आढळून येत नाहीत काय? उलट अलीकडील समाजशास्त्रीय अभ्यासातून, माणसे कोठेही राहिली तरी काही वैशिष्ट्ये कायम राखतात असेच आढळून आले आहे. ते स्वाभाविकही आहे, कारण ती त्याच्या माणुसपणाशी निगडित आहेत. (अस्वाभाविक व अतिरेकी गर्दीचा प्रांत सोडला तर) माणूस चाळीत राहतो की ब्लॉकमध्ये राहतो की बंगल्यात राहतो ही गोष्ट निर्णायक महत्त्वाची नाही. महत्त्व त्याला निवडस्वातंत्र्य किती आहे, बंधनांचा काच किती कमीअधिक मोठा आहे या गोष्टींना आहे. (इथे, सर्वांच्या गरजा सारख्याच वैचित्र्यपूर्ण, महत्त्वाकांक्षी नसतात व निवडस्वातंत्र्य व बंधनांचा काच यांचा माणसाच्या मानसिक क्षितिजांशी संबंध आहे हे लक्षात घेतले पाहिजे. उदाहरणार्थ, बहुतेकांना एकांतात निवांत, बव्हंशी खासगी जीवन जगायला संधी दिली तरी ती नको असेल.) या पार्श्वभूमीवर अमुक एका धाटणीच्या नगरनियोजनाने कोणाकोणाच्या निवडस्वातंत्र्याच्या कक्षा किती रुंदावतात, परिस्थितीने निर्माण केलेले काच किती सैल होतात, दूर होतात ते पाहणे, ती कसोटी मानणे इष्ट ठरेल.

पाह्ल यांचा हा मुद्दा महत्त्वाचा आहे. घर असो की नगर, त्याची बांधणी ही त्यात राहणाऱ्या, त्याचा वापर करणाऱ्या

माणसांना बाजूला ठेवून, त्यांच्या निरपेक्ष, केवळ स्थापत्य विशारदाचे वा नगरनियोजकाचे खाजगी हेतू (किंवा पुष्कळदा चोचले) पूर्ण करण्यासाठी करणे अयोग्य आहे. तसेच, ज्या प्रकारचे जीवन मला आकर्षक वाटते ते सर्वांनाच वाटत असते, ज्या माझ्या गरजा आहेत त्याच इतर साऱ्यांच्याही आहेत या भूमिकेतून नगरनियोजकाने काम करता कामा नये. ज्यांच्यासाठी नियोजन आहे त्यांच्या गरजांचे, जीवनाच्या आकृतिबंधाचे अवधान सुटता कामा नये.

पण समाजाजवळची एकंदर साधनसंपत्ती मर्यादित असल्याने अग्रक्रम कोणाला द्यावयाचा हा मुद्दा कळतनकळत उपस्थित होणारच. आणि म्हणून नगरनियोजन संघर्ष व राजकारण यांच्यापासून वेगळे राहू शकत नाही. पाह्ल म्हणतात, 'सत्ता, धन व प्रतिष्ठा यांचे विषम वाटप असलेल्या संघर्षात्मक परिस्थितीत कोणतीही योजना वा व्यवस्था समाजातील कोणत्या ना कोणत्या (बहुधा सर्वांत कमी सत्ता असणाऱ्या) गटावर बंधन लादणारी, त्यांना गैरसोयीत टाकणारी असणार. समाजातील निरनिराळ्या गटांची मूल्ये व उद्दिष्टे वेगवेगळी असणार आणि त्यांच्या हाती कमी-अधिक सत्ता असणार. (त्यातून वेगवेगळ्या गटांत संघर्ष उद्भवणार.) किंबहुना या संघर्षाची समाजाच्या प्रगतीसाठी गरज आहे.' या संघर्षांच्या चौकटीतच नगरनियोजनाच्या विभिन्न विचारप्रणालींचा निवाडा योग्यरीत्या करता येतो. उदाहरणार्थ, 'शहरातील गरिबांची वस्ती नव्याने बांधून काढल्याने मुळात ते ज्यामुळे गरीब झालेत ती कारणे दूर होत नाहीत. समाजात सत्तेचे वाटप ज्या प्रकारे झालेले आहे त्याची झोपडपट्टी ही मुख्यत्वेकरून परिणती आहे आणि हे (विषम) वाटप शक्तिशाली हितसंबंधी गटांकडून कायम ठेवले जाते व शहरात त्याचा स्थलरचना, झोपडपट्ट्या इ. अंगांनी भौतिक आविष्कार होत असतो. दरिद्री झोपडपट्ट्यांचे खरोखरीच निर्मूलन करावयाचे तर नगरनियोजकाला जाणीवपूर्वक सत्तेच्या विषम वाटपावर प्रहार केले पाहिजेत. लोकांना झोपडपट्ट्यांतून ढकलणाऱ्या प्रक्रिया तोडण्याचा एक मार्ग म्हणून नगर पुनर्निर्माणाकडे पाहिले पाहिजे.

अशा रीतीने, नगरनियोजनाच्या किंवा नागर प्रदेशाच्या नियोजनाच्या सुरुवातीसच हे नियोजन कोणासाठी, कोणत्या उद्दिष्टाने, कोणती मूल्ये स्वीकारून आपण करीत आहोत याची स्पष्टता स्वतःशी बाळगण्याचे महत्त्व ठामपणे सांगण्याचे एक आवश्यक व महत्त्वाचे कार्य पाह्ल पार पाडतात. 'सर्वनियोजन हे सामाजिक, समाजाचे नियोजन असते.
'

नियोजन हे उपभोक्त्यांच्या गरजांना अभिमुख असले पाहिजे ते लोकांसाठी आहे, नियोजकांसाठी नाही; खासगी क्षेत्राकडून ज्यांना कमीत कमी लाभ पदरात पडतात त्यांना सार्वजनिक क्षेत्राकडून जास्तीत जास्त लभ्यांश देणारे ते असले पाहिजे; आजच्या प्रस्थापित गरजांना धरून नियोजन केले गेले पाहिजे, उद्याच्या प्रयोगात्मक, मनोराज्यात्मक गरजा डोळ्यापुढे ठेवून नाही, असे काही इशारे ते देतात. तेही योग्यच आहेत. ते पुढे असेही म्हणतात, 'प्रादेशिक नगर नियोजकाच्या दोन प्रकारच्या वृत्तींमुळे ( तशी इच्छा नसताना ) गरीब अधिक अडचणीत येण्याची शक्यता ध्यानात घेतली पाहिजे. एक, दूरवरच्या गोष्टींवर लक्ष केंद्रित केल्यास आजच्या प्रश्नांना बगल दिली जाते. दुसरे, शहरी व प्रादेशिक रचनेच्या भौतिक पैलूंवर भर दिल्याने भौतिक पुनर्रचनेच्या मार्गाने आपण सामाजिक प्रश्न सोडवू असा नियोजकांचा भ्रामक समज होण्याची शक्यता आहे. जुनाट घरे पाडून टाकली, झोपडपट्टया उठविल्या म्हणजे

झोपडपट्ट्यांचा प्रश्न काही सुटत नाही.'*

** त्यांचे पुढील उद्गारही लक्षात घेण्यासारखे आहेत:*
*The more we know the context in the immediate future the more political pressures and economic constraints make policies unrealistic '.those committed to the plane may equally be reluctant to narrow their vision (as they might put it) since the bundle of policies needed to minimise constraints in the present may be messier than the new city on a near virgin site planned for the year 2000. It is more comfortable to be concerned with the expected mobility, second homes and leisure demands of the future affluent than with the present problems of the poor who, irritatingly, appear to be always with us. Problems connected with the poor seem more ambiguous than problems connected with affluence, and planners, by their very nature, may not like to live with such ambiguity. There is a clear need to avoid what Michael Young has called the dictatorship of the imagined future over the present ' (p. 242 )*

नगरनियोजकाने कोणती भूमिका घ्यायला हवी असे पाह्ल यांना वाटते याचा अंदाज पाह्ल यांच्या विवेचनावरून आला असेलच. नगरनियोजक, समाजशास्त्रज्ञ, इ. बहुतेक सर्व तज्ज्ञ हे सधन मध्यमवर्गीय असणार - म्हणजे उच्चविद्याविभूषित, उच्च पगारदार व श्रमजीवींपासून दूर राहणारे असणार. त्यांचे ज्ञान त्यांच्या हाती सत्ता देते. पण कोणत्या उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी ती त्यांनी वापरावी? त्यांनी आपल्या ज्ञानाचा वापर पददलितांच्या बाजूने करावा का, आणि तसा करावयाचा झाल्यास कोणत्या राजकीय विचारप्रणालीचा आधार त्यांनी घ्यावा?' बाजारयंत्रणेच्या कार्यवाहीतून सगळे काही घडून येईल असा ज्यांचा विश्वास आहे त्यांना सोडले तर, प्रबुद्ध स्वार्थ वा सृजनशील करुणा, दोन्हींनी प्रेरित झालेल्यांनी दलितांच्या बाजूने प्रत्यक्ष, विधायक पक्षपाताची भूमिका घेतली पाहिजे ही गोष्ट उघड आहे.

'कोणाचे शहर?' या प्रश्नाचे उत्तर 'सत्ता कोणाची?' या प्रश्नाच्या उत्तराने ठरणार. तेव्हा प्रभावी राजकीय संघटन अत्यावश्यक आहे. आपली मूल्यबैठक कोणती त्याचा जाणीवपूर्वक व पक्का निर्णय केला पाहिजे. सर्वांचेच अधिकाधिक सुख साधणारे नियोजन आपण करीत आहो हा नियोजकाचा दावा मूर्खपणाचा आहे. सत्ता, धन व प्रतिष्ठा यांचा पुरवठा अपुरा असल्याने त्यावरून चाललेल्या मूलभूत कलहाचे प्रतिबिंब राजकीय संघर्षात पडणारच. अपुऱ्या साधनसंपत्तीच्या वाटपाशी नियोजनाला अटळ कर्तव्य असल्याने नियोजनाला राजकीय रंग असलाच पाहिजे. आजचे शहर हे आजच्या व पूर्वीच्या सत्तेच्या वाटपाचे प्रतिबिंब आहे. म्हणून शहराचा घाट आपल्याला बदलायचा असेल तर समाजातील सत्तेच्या वाटपाचा घाट बदलला पाहिजे. 'म्हणूनच' लोकशाही समाजात सुभग शहर समाजात कमी आणि अधिक सत्ता हाती असणाऱ्यांच्यातील संघर्षातूनच उदयास येईल.

पाह्ल यांच्या पुस्तकात इतरही अनेक मार्मिक मुद्दे मांडलेले आहेत. नगररचना, नागरी जीवन व नागरीकरण या क्षेत्रांत समाजशास्त्राने बजावलेली क्षुल्लक कामगिरी व बजवायला हवे ते कार्य, समाजशास्त्रज्ञांना नगरनियोजनात काय हातभार लावता येईल, यासंबंधी त्यांचे विवेचनही मौलिक आहे.